**आमदार स्थानिक विकास कार्यक्रम**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी लेखाशीर्ष ४५१५ ००१२ अंतर्गत मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीचे निधी वितरण.

**महाराष्ट्र शासन**

**नियोजन विभाग**

**शासन ज्ञापन क्रमांक-स्थाविका-०४१८/प्र.क्र.५६/ का-१४८२,**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक :- ६ ऑगस्ट, २०१८.

वाचा:- १) नियोजन विभाग, शासन निर्णय, क्रमांक- स्थाविका-०६१६/प्र.क्र.९६/का.१४८२, दिनांक १२.७.२०१६

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र. ६९/अर्थ-३, दिनांक २.४.२०१८

३) नियोजन विभाग, ज्ञापन क्रमांक- स्थाविका-०४१८/प्र.क्र.५६/का.१४८२, दिनांक २५.४.२०१८, दिनांक १४ मे, २०१८ व दिनांक ८ जून, २०१८

**ज्ञापन :-**

महाराष्ट्र विधानमंडळाने, "महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१८" मंजूर केले असून ते महाराष्ट्राचे राज्यपाल महोदय यांच्या अधिसंमतीनुसार महाराष्ट्र अधिनियम क्र. २२ म्हणून, महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक २७ मार्च, २०१८ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

२. आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांकरिता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये एकूण **₹७३४,००,००,०००/- (अक्षरी रुपये सातशे चौतीस कोटी फक्त)** इतका नियतव्यय मंजूर असून तो संपूर्ण अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. तसेच वित्त विभाग, परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र. ६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८ अन्वये सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत अर्थसंकल्पित केलेल्या निधीच्या १००% निधी वितरीत करण्यास मंजुरी दिली आहे.

३. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. स्थाविका-०६१६/प्र.क्र.९६/का.१४८२, दिनांक १२.७.२०१६ मधील परिच्छेद २.१ येथील तरतूदीनुसार सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता राज्यातील २८९ विधानसभा सदस्यांना एकूण ₹ ५७७,६६,६८,०००/- (रु. पाचशे सत्त्याहत्तर कोटी सहासष्ट लक्ष अडुसष्ट हजार फक्त ) तसेच ७८ विधान परिषद सदस्यांना त्यांच्या अनुज्ञेयतेनुसार ₹ १२६,१६,१८,०००/- (रुपये एकशे सव्वीस कोटी सोळा लक्ष अठरा हजार फक्त) याप्रमाणे एकूण ₹ ७०३,८२,८६,०००/- एवढा निधी यापूर्वीच वितरीत करण्यात आला आहे.

४. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. स्थाविका-०६१६/ प्र.क्र.९६/का.१४८२, दिनांक १२/७/२०१६ मधील परिच्छेद ४.३ मध्ये सुधारणा करुन कोणत्याही कारणामुळे महाराष्ट्र विधीमंडळ सदस्यांचा कालावधी आर्थिक वर्ष पूर्ण होण्यापूर्वीच संपुष्टात आल्यास अथवा सुरु झाल्यास त्या आर्थिक वर्षातील सदस्यांचा कार्यकाल विचारात घेऊन दरमहा ₹ १६.६६ लक्ष याप्रमाणे निधी वितरीत करण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये स्थानिक स्वराज्य संस्थाद्वारा मे, जून व जुलै, २०१८ मध्ये एकूण १० विधानपरिषद सदस्य निर्वाचित झाले आहेत. त्यापैकी खालील तक्त्यात दर्शविलेल्या ५ विधानपरिषद सदस्यांनीच आपला नोडल जिल्हा घोषित केला असल्याने या आर्थिक वर्षातील त्यांचा कालावधी विचारात घेता त्यांना पुढील तक्त्यात रकाना क्र. ५ मध्ये दर्शविलेला निधी अनुज्ञेय आहे.

| अ. क्र. | निर्वाचित विधीमंडळ सदस्याचे नाव | नोडल जिल्हा | या ज्ञापनान्वये मंजूर करण्यात येत असलेला निधी (रु. हजारात) |
|---|---|---|---|
| १ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री. नरेंद्र दराडे | नाशिक | १५००२ |
| २ | श्री. विप्लव बाजोरिया | हिंगोली | १५००२ |
| ३ | श्री. प्रविण पोटे-पाटील | अमरावती | १५००२ |
| ४ | श्री. रामदास आंबटकर | वर्धा | १५००२ |
| ५ | श्री. किशोर भिकाजी दराडे | नाशिक | १५००२ |
| | **एकूण...** | | **७५०१०** |

५. उपरोक्त तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे एकूण ₹ ७,५०,१०,०००/- ( रुपये सात कोटी पन्नास लक्ष दहा हजार फक्त ) एवढा निधी या ज्ञापनाद्वारे मंजूर करण्यात येत असून सदर निधी संबंधित नोडल जिल्हयांच्या जिल्हाधिकारी, यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. जिल्हाधिकारी यांनी नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. स्थाविका-०६१६/प्र.क्र.९६/का.१४८२, दिनांक १२ जुलै, २०१६ च्या तरतुदींच्या अधीन राहून या निधीचे पुढील वितरण तात्काळ करावे.

६. आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. स्थाविका-०६१६/ प्र.क्र.९६/का.१४८२, दिनांक १२ जुलै, २०१६ अन्वये विहित केलेल्या मार्गदर्शक तत्वांत बसणारी कामे जिल्हाधिकाऱ्यानी मंजूर करावीत. सदर निधीचा विनियोग करतांना वित्त विभागाच्या क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र. ६९/ अर्थ-३, दि. २ एप्रिल, २०१८ च्या परिपत्रकातील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे. तसेच विविध स्तरावरील सार्वत्रिक निवडणुकांच्या आचारसंहितेचा कालावधी तसेच केंद्र व राज्य निवडणुक आयोगाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन निधीचा विनियोग करावा. वितरीत केलेल्या निधीचा विनियोग पूर्णपणे होईल याची जिल्हाधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी. तसेच या निधीमधून झालेल्या खर्चाचा ताळमेळ घेण्याची कार्यवाही विहित वेळेत पूर्ण करावी.

७. हे ज्ञापन शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८/ प्र.क्र. ६९ / अर्थ-३, दि. ०२ एप्रिल, २०१८ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८०८०६१७१८३३४३१६ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vijesing Fattesing Vasave

Digitally signed by Vijesing Fattesing Vasave
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a7de9682e22326e67a2c7e4125e658721c298e35048adffdff595b37a1b194aa, cn=Vijesing Fattesing Vasave
Date: 2018.08.06 17:22:26 +05'30'

**( वि. फ. वसावे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
२. मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
३. महालेखापाल (लेखापरीक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई
४. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर, ठाणे, रायगड, नाशिक, बीड, हिंगोली, अमरावती व वर्धा
५. सर्व उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय,
६. जिल्हा नियोजन अधिकारी, मुंबई उपनगर, ठाणे, रायगड, नाशिक, बीड, हिंगोली, अमरावती व वर्धा
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई उपनगर, ठाणे, रायगड, नाशिक, बीड, हिंगोली, अमरावती व वर्धा
९. वित्त विभाग (कार्यासन अर्थ-१६ / व्यय-८)
१०. निवड नस्ती-का. १४८२, नियोजन विभाग